**जलसंपदा विभागाच्या दरसूची मध्ये अंतर्भूत नसलेल्या बाबींचे (Non-D.S.R. items) दर ठरविण्या संदर्भात विचारात घ्यावयाच्या बाबी.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- दरसूची-२३१०/(५४/१०)/लपा-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक ३/६/२०१०**

**१.०) प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागाच्या दरसूचीमध्ये अंतर्भूत नसलेल्या बाबींचे **(Non-D.S.R. items)** दर ठरविण्यासाठी सद्यःस्थितीत कोणतीही मार्गदर्शक तत्त्वे अस्तित्त्वात नाहीत. तसेच अशा बाबींचे दर ठरविण्यासाठी कोणतीही कार्यपध्दत उपलब्ध नसल्याने क्षेत्रिय अधिका-यांकडून या प्रकरणात अनुसरण्यात येणा-या कार्यपध्दतीत एकसुत्रता आढळत नाही. त्यामुळे एकाच बाबीसाठी विविध मंडळांनी मंजुर केलेल्या दरासूचीबाह्य बाबींचे दरात तफावत आढळून येते. त्यामुळे अशा दरसूचीबाह्य बाबींचे दर ठरविताना दरपृथ्थःकरणाची कार्यपध्दत व त्याची रचना यामध्ये सुसुत्रता असण्याचे दृष्टीने शासनाने शा.नि.क्र. निविदा ११०९/(६३१/२००९)/मोप्र-२,दिनांक ३०.११.२००९ च्या निर्णयान्वये स्थापन केलेल्या अभ्यास गटाच्या अहवालात दरसूचीमध्ये अंतर्भुत नसलेल्या बाबींचे दर ठरविण्यासाठी मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यासाठी शिफारस केली आहेत. त्यातील खाली नमुद केलेली मार्गदर्शक तत्वे शासनाने स्विकारली आहेत.

१.१ प्रथमतः अन्य विभागांच्या (उदा.सार्वजनिक बांधकाम, पाणी पुरवठा व जलनिसाःरण / महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, यांत्रिकी संघटना, केंद्रीय लोक निर्माण विभाग-इ.) मान्यता प्राप्त दरसूचीमध्ये अशा बाबींचे दर उपलब्ध असल्यास त्या दराचा उपयोग आपल्या कामाशी योग्य प्रमाणात उपयोगिता असल्याची खात्री करुन करावा.

१.२ महाराष्ट्रालगतच्या राज्यांतील (उदा.गुजरात, मध्यप्रदेश, कर्नाटक, आंध्रप्रदेश, छत्तीसगड, गोवा इ.) पाटबंधारे / सार्वजनिक बांधकाम विभागांच्या दरसूचीतील अशा बाबींचे दर उपलब्ध असल्यास ते आहे तसे विचारात न घेता अशा बाबींच्या दर पृथःकरण रचनेच्या आधारे स्वतंत्रपणे दराची परिगणना करून दर निश्चिती करावी.

१.३ अगदी हुबेहुब बाबीचा दर उपलब्ध नसल्यास त्या बाबीशी समांतर / समकक्ष बाबीचे दर उपलब्ध असल्यास त्यावर आधारित दर विश्लेषण प्राथमीक स्वरूपात पृथक्करण करुन विचाराधीन बाबीच्या दराची परिगणना करावी व त्यावर आधारीत दर काढावेत.

१.४ अन्य विभागांच्या दरसूचीत आवश्यक बाब किंवा समकक्ष बाब उपलब्ध नसल्यास कार्यकारी अभियंता यांनी दैनंदिन वृत्तपत्रांमध्ये देण्यात येणाऱ्या विविध बांधकाम साहित्याच्या दरांचा वापर दर विश्लेषणासाठी करुन प्राथमीक स्वरूपात पृथक्करण करुन दर निश्चिती करावी. संकेतस्थळावरुन देखील विविध प्रकारच्या बांधकाम साहित्याचे दर विचारात घेण्यास हरकत नसावी. (उदा. SAIL च्या संकेतस्थळावरुन विविध प्रकार / श्रेणीच्या स्टीलचे दर गृहित धरण्यास हरकत नाही) आवश्यकतेनुसार कमीत कमी अंतरासाठी व किफायतशीर मार्गाने (उदा. रेल्वे इ.) परिगणना करुन वाहतूक खर्च विचारात घेण्यास हरकत नाही. मात्र वहन अंतरास मुख्य अभियंता यांची पूर्व परवानगी घ्यावी.

१.५ वरील कार्यपध्दतीनुसार ज्या बाबींचे दर सुनिश्चित करणे शक्य होत नाही अशा विशिष्ट बाबींसाठी कार्यकारी अभियंता यांनी वृत्तपत्रात शासनाच्या प्रचलित जाहीरात विषयक / वृत्तपत्रातील प्रसिध्दी विषयक धोरणातील विहित मार्गदर्शक सूचनांनुसार जाहीरात देवून,व्यापक प्रसिध्दी देउन संबंधित बाबींचे काम करणाऱ्या अनुभवी कंत्राटदारांकडून, पुरवठादारांकडून दर पृथःकरणासह अंदाजपत्रक तयार करण्यासाठी म्हणून दर पोस्टाद्वारे मागवावेत. अशा प्रकारे प्राप्त झालेल्या दरांची छाननी करुन त्यानुसार दर पृथ्थःकरण करुन येणा-या निम्नत्तम दराचा मान्यतेसाठी विचारा व्हावा.

१.६ विभागीय दरसूची तसेच दरसूचीबाह्य बाबींसाठी दरपृथक्करण करताना ते Task work / Task turnover व मजूरांचे दैनंदीन वेतनाचे दर नमुद करूनच दरपृथक्करण करावे.

तरी उपरोक्त मार्गदर्शक तत्वांच्या आधारे दरसूचीमध्ये अंतर्भूत नसणा-या बाबींचे दर पृथ्थःकरण करण्यात यावे. या दर पृथ्थःकरणास व दरास महामंडळाच्या कार्यकारी संचालक, यांनी मान्यता द्यावी व अशा दरसूची बाह्य दरांचा वापर करुन त्या आधारे बांधकाम यंत्रणेने प्रकल्पाच्या कामाची अंदाजपत्रके तयार करताना / अंदाजपत्रक अद्यावत करताना वापरावेत.

अशा बाबीचा अंदाजपत्रकामध्ये समावेश केल्यास, दर निश्चित करण्यासाठी कोणती कार्यपध्दती वापरली आहे याचा स्पष्ट उल्लेख अंदाजपत्रकासोबतचे सर्वसाधारण टिप्पणी मध्ये करावा

वरीलप्रमाणे निदर्शनास आलेल्या जास्तीत जास्त दरसूचीबाह्य बाबींचा समावेश दरात सर्वत्र एकवाक्यता राहण्याच्या दृष्टीने टप्प्या-टप्प्याने जलसंपदा विभागाच्या विभागीय दरसूचीत करण्यात यावा.

सदर सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर परिपत्रक शासनाचे वेबसाईट २०१००६०३१४३६१८००१ वर ठेवण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(च.आ.बिराजदार)

मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव

प्रत,

महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
सर्व मुख्य अभियंता, व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
सर्व क्षेत्रिय अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
लपा-२ कार्यासन संग्रहार्थ.